

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## १२८) मीनाक्षीपंचरत्नम् -१

उद्यद्भानु सहस्रकोटिसदृशां केयूरहारोज्ज्वलां
बिम्बोष्ठीं स्मितदन्तपंक्तिरुचिरां पीताम्बरालंकृताम् ।
विष्णुब्रह्मसुरेन्द्रसेवितपदां तत्वस्वरूपां शिवां
मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् ।। १।।

मीन म्हणजे मासोळी. अक्ष म्हणजे डोळे. जिचे डोळे मासोळी प्रमाणे लांब, दोन्हीकडे निमुळते, त्यातही कानाकडे अधिक वाढलेले आणि मध्यभागी विशाल असतात ती मीनाक्षी. मासोळीचे डोळे टपोरे असतात. तसे जिचे नेत्र ती मीनाक्षी.

अशा प्रकारच्या सुंदर नेत्रांनी सुशोभित आई जगदंबे चे नाव आहे मीनाक्षी.

दक्षिण भारतात मदुराई नामक स्थानी देवी मीनाक्षीचे विश्व प्रसिद्ध मंदिर आहे.

या देवी मीनाक्षीच्या वंदनार्थ आचार्यश्रींनी मीनाक्षी पंचरत्नम् आणि मीनाक्षी स्तोत्रम् अशा दोन रचना केल्या आहेत.

या मीनाक्षी पंचरत्नम् स्तोत्रामध्ये आईचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

उद्यद्भानु सहस्रकोटिसदृशां- हजारो कोटी सूर्य एकाच वेळी उगवले तर ते तेज जसे असेल तशी तेजस्वी असणारी. तरीही उगवत्या सूर्याप्रमाणे आल्हाददायक.

केयूर- बाजूबंद

हार- गळ्यात,केसात शोभणाऱ्या मोत्यांच्या माळा.

उज्वलां- अत्यंत तेजस्वी आहेत अशी. त्यांच्या सौंदर्याने अधिकच तेजस्वी दिसणारी.

बिम्बोष्ठीं- पिकलेल्या तोंडल्याप्रमाणे लाल बुंद ओठ असणारी.

स्मितदन्तपंक्तिरुचिरां- किंचित् हास्य केल्यामुळे जिची दंतपंक्ती दिसून येत असल्याने अधिकच सुंदर दिसणारी.

पीताम्बरालंकृताम् - दिव्य असा पीतांबर धारण केलेली.

विष्णुब्रह्मसुरेन्द्रसेवितपदां - विष्णू, ब्रह्मदेव इत्यादि महेश्वर, सुरेंद्र अर्थात देवराज इंद्र. त्यांच्यासह समस्त देवतां जिच्या चरणांची सेवा करत असतात अशी.

तत्वस्वरूपां - परब्रह्मस्वरूप असणारी.

शिवां- अत्यंत पवित्र, भगवान शंकरांची सहधर्मचारिणी.

मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम्- कारुण्य सागर स्वरूप असणाऱ्या अशा देवी मीनाक्षी ला मी सतत वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## १२९) मीनाक्षीपंचरत्नम् -२

मुक्ताहारलसत्किरीटरुचिरां -
पूर्णेन्दुवक्त्र प्रभां
शिञ्जन्नूपुरकिंकिणिमणिधरां पद्मप्रभाभासुराम् ।
सर्वाभीष्टफलप्रदां गिरिसुतां वाणीरमासेवितां
मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् ।। २।।

आई जगदंबेच्या लोकविलक्षण सौंदर्याचे तथा तिच्या दिव्य तात्त्विक स्वरूपाचे वर्णन करतांना, आचार्य श्री प्रथम दोन चरणात आईने धारण केलेल्या अलंकारांचे आणि त्यांनी फुललेल्या सौंदर्याचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात,

मुक्ताहारलसत्किरीटरुचिरां- मोत्यांचे हार लटकत असल्यामुळे अधीकच शोभून दिसणाऱ्या मुकुटाने सुशोभित असणारी.

आईच्या मस्तकावर असणाऱ्या रत्नजडित सुवर्ण मुकुटाला मोत्यांचे हार लटकत आहेत. त्याने मुकुटाचे सौंदर्य वृद्धिंगत झाले आहे. अशा मुकुटाने आई अधिकच सुंदर दिसत आहे.

पूर्णेन्दुवक्त्र प्रभां- पूर्ण विकसित पौर्णिमेचा चंद्रबिंबा प्रमाणे अत्यंत सुंदर मुखाची आभा सर्वत्र विलसत आहे अशी.

शिञ्जन्नूपुर- जिच्या चरणातील नूपुर अर्थात पैंजणांचा अत्यंत सुंदर ध्वनी सर्वत्र गुंजत आहे अशी.

किंकिणिमणिधरां- जिच्या कंबर पट्ट्यात, वस्त्रात तथा अन्य अलंकारात लावलेले छोटी-छोटी घुंगरू किन् किन् असा सुंदर आवाज करीत आहेत अशी.

पद्मप्रभाभासुराम् - कमळाच्या सौंदर्या प्रमाणे तेजस्वी असणारी. परम आकर्षक असणारी. भक्तगणांच्या चित्ताला मोहीत करणारी. सर्वाभीष्टफलप्रदां- साधकांना सुयोग्य अशी सकल फले प्रदान करणारी. गिरिसुतां- गिरी म्हणजे पर्वत. सकल पर्वतांचा राजा हिमालय. त्याच्या घरी कन्या रूपात अवतार घेतलेली . वाणीरमासेवितां- वाणी अर्थात देवी सरस्वती आणि रमा अर्थात देवी लक्ष्मी यांच्याद्वारे, अर्थात समस्त ईश्वरी शक्तींच्या द्वारे सेवा केली जात आहे अशी.

मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् -

कारुण्याचा जणू काही सागर असणाऱ्या देवी मीनाक्षीला मी सतत वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३०) मीनाक्षी पंचरत्नम् -३

श्रीविद्यां शिववामभागनिलयां ह्रींकारमन्त्रोज्ज्वलां
श्रीचक्राङ्कित बिन्दुमध्यवसतिं श्रीमत्सभानायकीम् ।
श्रीमत्षण्मुखविघ्नराजजननीं श्रीमज्जगन्मोहिनीं
मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् ।। ३।।

श्रीविद्यां- आई जगदंबेच्या तात्त्विक स्वरूपाचे निरूपण करणाऱ्या शास्त्राला श्रीविद्या असे म्हणतात.

शिववामभागनिलयां- भगवान शंकरांच्या अर्ध्या डाव्या भागामध्ये निवास करणारी.

स्त्री आणि पुरुषाच्या शरीराचा विचार करताना शास्त्रात पुरुषाचे उजवे तर स्त्रीचे डावे अंग पवित्र स्वरूपात वर्णन केले आहे. पुरुष सामान्यतः बुद्धिप्रधान असतो तर स्त्री सामान्यत: भावनाप्रधान.

अर्धनारीनटेश्वर स्वरूपात उजवे अंग भगवान शंकरांचे तर डावे अंग आई जगदंबेचे असते. दोघांचाही पवित्र भागाचे एकत्रीकरण. परमपवित्र असे हे स्वरूप.

ह्रींकारमन्त्रोज्ज्वलां- ह्रीं या मंत्राने प्रकाशित असणारी. त्या स्वरूपात विश्वाला मार्गदर्शन करणारी. त्याच्या आधारे साधकांना दर्शन देणारी.

श्रीचक्राङ्कित बिन्दुमध्यवसतिं- श्रीयंत्र याच्या मध्यभागी असणाऱ्या बिंदूवर निवास करणारी, श्रीमत्सभानायकीम् - श्री म्हणजे वैभव. त्याने युक्त असल्यामुळे भगवंताला श्रीमत्, श्रीमान असे म्हणतात. त्यांची सभा अर्थात हे संपूर्ण विश्व. या जगाची नायिका ती श्रीमत्सभानायकी.

श्रीमत्षण्मुखविघ्नराजजननीं- सहा मुख असल्यामुळे त्यांना षण्मुख असे म्हणतात ते कार्तिकेय, स्कंद.

विनायक अर्थात भगवान शंकर पार्वती च्या घरी झालेले श्री गणेश अवतार.

यांची जननी.माता.

श्रीमज्जगन्मोहिनीं- संपूर्ण जगाला आकर्षित करणाऱ्या,

मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् - कारुण्याचा जणू काही महासागर असणाऱ्या, आई जगदंबा मीनाक्षीला मी सतत वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३१) मीनाक्षी पंचरत्नम्-४

श्रीमत्सुन्दरनायकीं भयहरां ज्ञानप्रदां निर्मलां
श्यामाभां कमलासनार्चितपदां नारायणस्यानुजाम् ।
वीणावेणुमृदङ्गवाद्यरसिकां नानाविधामम्बिकां
मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् ।। ४।।

श्रीमत्सुन्दरनायकीं- मदुराई येथे असणाऱ्या मीनाक्षी मंदिरामध्ये भगवान श्रीशंकरांचे श्रीनटराज स्वरूप विद्यमान आहे. या स्वरूपाला तेथे श्री सुंदरेश्वर असे म्हणतात. त्या श्रीमान भगवान सुंदरेश्वरांची नायिका देवी श्री मीनाक्षी श्रीमत्सुन्दरनायकी स्वरूपात वंदिली जाते.

भयहरां - भक्तांच्या भीतीचे हरण करणारी. सगळ्यात मोठी भीती असते मृत्यूची. आई जगदंबेच्या कृपेने मोक्ष प्राप्त होत असल्याने ही भीतीच नष्ट होते.

ज्ञानप्रदां- या मोक्षाला कारण असणारे आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान प्रदान करणारी.

निर्मलां- शुद्ध चैतन्यस्वरूपिणी, माया मल विरहित अशी.

श्यामाभां- आपल्या अत्यंत तेजस्वी सावळ्या वर्णाने आकर्षक दिसणारी. कमलासनार्चितपदां- कमळावर बसणाऱ्या भगवान ब्रह्मदेवांनी चरणकमलांची उपासना केली आहे अशी. नारायणस्यानुजाम् - भगवान श्री नारायण अर्थात श्री विष्णूंची लहान भगिनी.

वीणावेणुमृदङ्गवाद्यरसिकां- वीणा, वेणू म्हणजे बासरी आणि मृदंग इत्यादी वाद्यांच्या ध्वनींचा रसिकत्वाने आस्वाद घेणारी.

यात वीणा हे तंतुवाद्य, बासरी हे वातवाद्य तर मृदंग हे चर्मवाद्य. अर्थात या तीनही प्रकारांमुळे परिपूर्ण होणारे संगीत.

नानाविधामम्बिकां- अनेक रुपांमध्ये नटून विश्व निर्माण करणाऱ्या,

मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् - कारुण्याचा जणू काही महासागर असणाऱ्या आई जगदंबा मीनाक्षीला मी सतत वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३२) मीनाक्षी पंचरत्नम् -५

नानायोगिमुनीन्द्रहृन्निवसतीं नानार्थसिद्धिप्रदां
नानापुष्पविराजितांघ्रियुगलां नारायणेनार्चिताम् ।
नादब्रह्ममयीं परात्परतरां नानार्थतत्वात्मिकां
मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् ।। ५।।

आई श्रीमीनाक्षीच्या मूलचैतन्यस्वरूपी आदिशक्ती स्वरूपाचे विशेष वर्णन करताना जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

नानायोगिमुनीन्द्रहृन्निवसतीं - कर्म,भक्ती तथा ज्ञानाच्याद्वारे भगवंताशी जुळतात त्यांना योगी असे म्हणतात. जे भगवंताच्या दिव्य स्वरुपाचे मनन करतात त्यांना मुनी असे म्हणतात. अशा असंख्य योगी आणि मुनी श्रेष्ठांच्या हृदयामध्ये निवास करणाऱ्या, नानार्थसिद्धिप्रदां- आपल्या उपासकांना अनेक प्रकारच्या सिद्धी प्रदान करणाऱ्या,

नानापुष्पविराजितांघ्रियुगलां- नानाविध पुष्पांचा द्वारी चरणकमले सुशोभित केलेली आहेत अशी.

पुष्पां साठी सुंदरतम शब्द आहे सुमन. भक्तांची, सज्जनांची सु-मने हीच आई जगदंबेच्या चरणाची सेवा करणारी खरी पुष्पे. त्या सु-मनांनी चरणकमले सुशोभित असणाऱ्या,

नारायणेनार्चिताम् - भगवान श्री नारायणांच्याद्वारे अर्चना केली जात असणाऱ्या,

नादब्रह्ममयीं- नादब्रह्म हे स्वरूप असणाऱ्या,

शास्त्रात ओंकार नाद असा शब्द आहे. जगात जे ऐकु येते त्याला ध्वनी असे म्हणतात. ध्वनीचे संयोगज आणि वियोगज असे दोन प्रकार आहेत. दोन गोष्टींच्या एकत्र येण्यातून वा दूर जाण्यातून ते प्रगटतात. कोणत्याही शब्दासाठी देखील हेच प्रयत्न करावे लागतात. मात्र ओंकाराच्या उच्चारात कशाचाच संयोग किंवा वियोग होत नाही. त्यामुळे त्याला अनाहत नाद असे म्हणतात. ते जिचे स्वरूप आहे अशी.

परात्परतरां- सर्व अधिक श्रेष्ठ असणाऱ्या नानार्थतत्वात्मिकां- विविध प्रकारच्या तत्त्वांनी अर्थात शास्त्र सिद्धांतांनी युक्त्य असणाऱ्या,

मीनाक्षीं प्रणतोऽस्मि संततमहं कारुण्यवारांनिधिम् - कारुण्याचा जणू काही महासागर असणाऱ्या आई मीनाक्षीचे मी सतत वंदन करतो.